**नागरी संरक्षण संचालनालयातील वरिष्ठ सहाय्यक उपनियंत्रक (गट ब) संवर्गातील ४ पदे पुनरुज्जीवीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक सीडीएम २०२०/प्र.क्र.६८/विशा-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २८ जुलै, २०२०

वाचा : १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. असंक १००१/प्रक्र२९/२००१/वित्तीय सूधारणा दिनांक १०.९.२००१
२) नागरी संरक्षण संचालनालयाचे पत्र क्र नासंसं/कार्या-३/पुनरुज्जीवित/प्रक्र ६/ खंड-३/२०१९/१७४, दिनांक २२.२.२०१९

**प्रस्तावना:-**

नागरी संरक्षण संचालयाअंतर्गत वरिष्ठ सहाय्यक उपनियंत्रक (गट-ब) (वेतनश्रेणी रु ९३००-३४८००, ग्रे.पे.४४००) संवर्गात एकूण ९ पदे मंजूर होती. सदर सर्व पदे दिनांक ४.५.२०१४ ते दि. १.१२.२०१५ या कालावधीत रिक्त झाली. सदर पदे पदोन्नतीने भरण्यात न आल्यामुळे उपरोक्त संदर्भ क्र १ येथील शा.नि., वित्त विभाग दिनांक १०.९.२००१ मधील तरतूदीनुसार व्यपगत झालेली आहेत. नागरी संरक्षण संचालनालयाचे संदर्भ क्र २ येथील पत्र, दिनांक २२.२.२०१९ अन्वये या पदांचा पुनरुज्जीवनाचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला. त्याअनुषंगाने ही पदे पुनरुज्जीवीत करण्याचा प्रस्ताव शा.नि. वित्त विभाग दिनांक १०.९.२००१ अन्वये गठीत उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि. ३.२.२०२० रोजी झालेल्या बैठकीत ठेवण्यात आला. सदर उच्चस्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

नागरी संरक्षण संचालयाच्या आस्थापनेवरील वरीष्ठ सहाय्यक उपनियंत्रक (गट-ब) या संवर्गातील व्यपगत झालेली ४ पदे पुनरुज्जीवीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहेत.

तसेच वरीष्ठ सहाय्यक उपनियंत्रक (गट-ब) या पदाचा निम्न संवर्ग सहाय्यक उपनियंत्रक / उपनियंत्रक अधिकारी यांसंवर्गातील ४ पदे निरसित / रद्द करण्यात येत आहेत.

२. संचालक, नागरी संरक्षण संचालनाल यांनी सदर पदे पुनरुज्जिवित केल्यामुळे होणाऱ्या खर्चासंदर्भात व्यय अग्रक्रम समितीच्या मान्यतेसाठी पूरक मागणीचे प्रस्ताव शासनास सादर करावा. तसेच वरील निर्णयाच्या अनुषंगाने नागरी संरक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील पदांचा सुधारीत आराखडा मान्यतेसाठी शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग शा.नि. दिनांक १०.९.२००१ अन्वये गठीत उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि. ३.२.२०२० रोजी झालेल्या बैठकीत झालेल्या निर्णयास अनुसरुन तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक १७१/आ.पु.क., दि. २२.०४.२०२०अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००७२८१३१९०१३५२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Deepak Vasant Sawant

Digitally signed by Deepak Vasant Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=43cdfecb6fd26ff7b1b970520962ebf72d86546b92151214820b2bb31f3ccac8, cn=Deepak Vasant Sawant
Date: 2020.07.28 13:25:47 +05'30'

**( दि.व. सावंत )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, नागरी संरक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
३. महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाच्या अधिपत्त्याखालील सर्व कार्यालये.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
७. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-८/ अर्थसं-११/ आपुक), मंत्रालय, मुंबई ४००० ३२.
८. निवड नस्ती, विशा-८, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई.